कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांच्या
बदल्या व नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन
# जलसंपदा विभाग
## शासन आदेश क्रमांकः एलटीएस-१११८/(२५४/२०१८)/आ.(वर्ग-१)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०३ नोव्हेंबर, २०१८.

संदर्भ :- १. जलसंपदा विभाग, शासन आदेश क्र.एसएलएस-१११७/(३१८/२०१७)/भाग-२/आ.(वर्ग-१), दि.२१.०६.२०१८.
२. मृद व जलसंधारण विभाग, शासन आदेश क्र.आस्थाप-२०१८/प्र.क्र.९२/जल-२, दि.०४.०९.२०१८.

**शासन आदेश :-**

संदर्भाधीन शासन आदेशान्वये सहायक अभियंता श्रेणी-१ संवर्गातील श्री.सलीम सय्यद गफूर आवटे यांची कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नती देऊन, त्यांची सविस्तर पदस्थापना मृद व जलसंधारण विभागांतर्गत करण्याकरीता त्यांच्या सेवा मृद व जलसंधारण विभागामध्ये वर्ग करण्यात आल्या होत्या. तथापि, अद्याप ही मृद व जलसंधारण विभागाने त्यांना सविस्तर पदस्थापना न दिल्याने ते सध्या पदस्थापनेविना असून, त्यांनी जलसंपदा विभागातच पदस्थापना देण्याची विनंती केली आहे.

२. तसेच, संदर्भ क्र.२ येथील मृद व जलसंधारण विभागाच्या आदेशान्वये श्री.सलीम सय्यद गफूर आवटे यांना उपविभागीय जलसंधारण अधिकारी, उप विभाग, अक्कलकोट या पदावरून कार्यमुक्त करून त्यांच्या सेवा सदर आदेशान्वये जलसंपदा विभागाकडे प्रत्यावर्तीत करण्यात आलेल्या आहेत.

३. यास्तव, प्रशासकीय कारणास्तव, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने श्री.आवटे यांची जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गात खाली दर्शविल्याप्रमाणे सविस्तर पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | बदलीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री. सलीम सय्यद गफूर आवटे. | पदस्थापनेविना | कार्यकारी अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे विभाग क्र.१, उस्मानाबाद. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी. |

४. संबंधित वरिष्ठ अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, सदर नियुक्ती/पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास आपल्या नवीन नियुक्तीच्या जागी तात्काळ हजर करून घ्यावेत.

तसेच, संबंधीत अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttclass1.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडी त्वरित कळवावे.

५. संबंधीत अधिकाऱ्यांना शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

६. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०३१३२३५१४५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Namdeo Jadhav

Digitally signed by Sanjay Namdeo Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5459d36186f52b61cb47b4246001e4c0bbd80c48f89adea8f0037e8608934214, serialNumber=5d495c041ec26693ec8970305b3bf74fd0e430fcd53917c7f440a44ac2dc6a30, cn=Sanjay Namdeo Jadhav
Date: 2018.11.03 13:26:37 +05'30'

**( संजय जाधव )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव (जलसंपदा प्रकल्प व विकास)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.

४. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
५. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
६. मुख्य अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण), पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
८. सर्व अधीक्षक अभियंता (स्थापत्य), जलसंपदा विभाग.
९. खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
१०. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (जलसंपदा),मंत्रालय, मुंबई.
११. सह सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१३. संबंधीत अधिकारी.
१४. कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.